**शासकीय प्राथमिक / माध्यमिक आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांच्या प्रवेशा संबंधी सुसूत्रता आणणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एएससी-२००४/प्र.क्र.७७/का.१३**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक : १५ जुलै, २००४**

**वाचा :**
१ शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१०९२/प्र.क्र.३०११/का.१३, दिनांक ५ नोव्हेंबर, १९९२.
२ शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी -१०९२/ ३०११/ का.१३, दिनांक २० फेब्रुवारी, १९९३.
३ शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र. एएससी-१४९६/गोप/११/प्र.क्र.४१/का.१३, दिनांक ३१ जानेवारी, १९९७.
४ शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र. संकीर्ण-१०९८/प्र.क्र.१२/का.१३, दिनांक ७ सप्टेंबर, १९९८.
५ शासन शुध्दीपत्रक, क्र. शाआशा-१४९८/प्र.क्र.८०/का.१३, दिनांक २५ सप्टेंबर, १९९८.
६ शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. शाआशा-२०००/प्र.क्र.१५ /का.१३, दिनांक १५ मार्च, २०००.

**प्रस्तावना :** भारतीय संविधानाच्या कलम ४६ प्रमाणे शासनावर अनुसूचित जमातीबाबत त्यांचे शिक्षणाच्या आर्थिक उन्नतीच्या दृष्टीकोनातून खास जबाबदारी टाकण्यात आली आहे. शिक्षणाचे महत्व लक्षात घेऊन शासनाने आदिवासींच्या शैक्षणिक व सामाजिक विकासासाठी "आश्रमशाळा समूह" ही योजना सन १९७२-७३ पासून सुरु केली आहे. आतापर्यन्त राज्यात एकूण ४४९ शासकीय आश्रमशाळा व ५५५ अनुदानित आश्रमशाळा मंजूर करण्यात आल्या आहेत. या आश्रमशाळा निवासी असून आश्रमशाळांतून प्रवेश दिलेल्या विद्यार्थ्यांना मोफत शिक्षणाव्यतिरिक्त भोजन, निवास, गणवेष, अंथरुण-पांघरुण, शैक्षणिक साहित्य, इ. सुविधा पुरविल्या जातात.

आश्रमशाळांमधून इयत्ता ७ वी उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांच्या माध्यमिक शिक्षणाची सोय करण्यासाठी शासनाने शासकीय आश्रमशाळांची माध्यमिक आश्रमशाळेत श्रेणीवाढ करण्याची योजना सन १९७८-७९ पासून सुरु केली आहे. या योजने अंतर्गत आतापर्यन्त ३२८ शासकीय आश्रमशाळांची तर २१९ अनुदानित प्राथमिक आश्रमशाळांची माध्यमिक आश्रमशाळेत श्रेणीवाढ करण्यात आलेली आहे. शासकीय / अनुदानित आश्रमशाळांमुळे आदिवासींच्या शैक्षणिक विकासात मोलाची भर पडली असून इतर शाळांपेक्षा शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमध्ये प्रवेश घेण्याकडे आदिवासींचा अधिक कल दिसून येतो. म्हणून शासकीय / अनुदानित आश्रमशाळेच्या प्रवेश नियमात सुसूत्रता आणण्याची बाब

शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार आश्रमशाळा विद्यार्थी प्रवेशाबाबत अनु.क्र. १ ते ६ वरील शासन निर्णय अधिक्रमीत करुन आश्रमशाळा प्रवेश नियम पुढीलप्रमाणे सुधारित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय** :- शासकीय अनुदानित आश्रमशाळांतील विद्यार्थी प्रवेशाबाबत पुढीलप्रमाणे मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात येत आहेत.

(१) **प्रवेश क्षमता व प्रवेशाबाबतचे नवीन धोरण**

शासकीय आश्रमशाळा व माध्यमिक आश्रमशाळांची प्रवेश क्षमता प्रत्येक वर्गात ४० आश्रमीय विद्यार्थी याप्रमाणे इ. ७ वी पर्यन्तचे वर्ग असलेल्या आश्रमशाळांची प्रवेश क्षमता २८० आश्रमीय विद्यार्थी व माध्यमिक आश्रमशाळांमध्ये ( इ. ८ वी ते १० वी या तीन वर्गांची ) १२० आश्रमीय विद्यार्थी राहील.

अ) शासकीय अनुदानित आश्रमशाळांमध्ये मुला-मुलींचे प्रवेशाचे प्रमाण ५० : ५० असे असावे. मात्र प्रवेशासाठी जर ५० टक्के मुली मिळाल्या नाहीत तर विद्यार्थीनींची क्षमता किमान ३३ टक्क्यापर्यन्त असणे आवश्यक आहे. विद्यार्थीनी उपलब्ध न झाल्यास रिक्त जागा आदिवासी विद्यार्थ्यांना प्रवेश देऊन क्षमता पूर्ण करावी.

ब) आश्रमीय विद्यार्थी हे आदिवासीच असावेत.

क) शासकीय / अनुदानित आश्रमशाळा ज्या गावात असेल त्या आश्रमशाळेच्या एकूण मान्यसंख्येच्या कमाल ५ टक्के विद्यार्थ्यांपर्यन्त बहिस्थ ( डेस्कॉलर ) विद्यार्थी म्हणून प्रवेश देण्यात यावा. यामध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्राधान्याने प्रवेश देण्यात यावा. जर यानंतर बहिस्थ विद्यार्थ्यांसाठी राखून ठेवलेल्या जागा शिल्लक राहिल्या तर अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात यावा.

जर गावात जिल्हा परिषदेची किंवा अनुदानित माध्यमिक शाळा असेल तर ५ टक्के आदिवासी बहिस्थ विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जाऊ शकेल. गावात इतर कुठलीही शाळा नसल्यास १० टक्के आदिवासी बहिस्थ विद्यार्थ्यांना प्रवेश देता येईल. या ५ टक्के व १० टक्के आरक्षणातून आश्रमशाळा कर्मचाऱ्यांची मुले वगळण्यात यावीत. कर्मचाऱ्यांची मुलेदेखील विनासवलत बहिस्थ म्हणून समजण्यात यावीत.

ड) शासकीय / अनुदानित आश्रमशाळांमध्ये प्रत्येक वर्गात शारीरिकदृष्ट्या अपंग विद्यार्थ्यांसाठी ३ टक्के आरक्षण राहील. अपंगांमध्ये आदिवासी विद्यार्थ्यास प्राधान्य द्यावे. १ किलोमीटरच्या परिसराबाहेर राहणाऱ्या अपंग विद्यार्थ्यांनी प्रवेश घेतल्यास त्याला निवासी विद्यार्थी म्हणून व १ किलोमीटरच्या आत राहणाऱ्या अपंग विद्यार्थ्याने प्रवेश घेतल्यास बहिस्थ विद्यार्थी समजण्यात यावे.

इ) अनुसूचित जमाती व्यतिरिक्त अन्य विद्यार्थ्यांना विनासवलत बहिस्थ विद्यार्थी म्हणून आश्रमशाळेव्यतिरिक्त गावात किंवा आजूबाजूच्या गावात अन्य शाळा नाहीत या शर्तीच्या अधीन राहून प्रवेश देता येईल.

ई) शासकीय अनुदानित आश्रमशाळांच्या आजुबाजूच्या गावातील दारिद्रय रेषेखालील आदिवासी जमातीच्या भूमीहीन / अल्पभूधारक विद्यार्थ्यांना प्रवेश देतेवेळी प्राधान्य द्यावे. दारिद्रय रेषेखालील आदिवासी विद्यार्थ्यांना प्रवेश दिल्यानंतर जागा रिक्त राहिल्यास दारिद्रय रेषेखाली नसलेल्या विद्यार्थ्यांचा प्रवेशासाठी विचार करता येईल.

उ) सर्व आदिवासी अर्जदारांचा विचार होऊन प्रवेश दिल्यानंतर इतर सर्व आदिवासींचा विचार करण्यात यावा. प्रवेश देतांना आश्रमशाळांच्या क्षेत्रातील गावांमधील लोकसंख्या विचारात घेऊन लोकसंख्येच्या प्रमाणात व अर्जदाराच्या संख्येच्या प्रमाणात मुलांना प्रवेश द्यावा. त्याशिवाय कार्यक्षेत्रातील प्रत्येक गावातील विद्यार्थ्यास त्या त्या प्रमाणात (प्रप्रोर्शनेटली) प्रवेश मिळेल याची प्रवेश देतेवेळी दक्षता घ्यावी.

ऊ) शासकीय / अनुदानित आश्रमशाळेत प्रवेश देतांना आदिवासींमधील आदिम जमाती उदा. कोलाम, कातकरी, माडीया यांना प्राधान्य देण्यात यावे. ठाणे, रायगड, पुणे, यवतमाळ आणि गडचिरोली या जिल्ह्यांतील कातकरी, कोलाम व माडीया या आदिम जमातीच्या विद्यार्थ्यांना आश्रमशाळांमध्ये प्रवेशासाठी खालील आरक्षण ठेवण्यात येत आहे :-

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | कातकरी | ठाणे | ८ टक्के | ( ३ विद्यार्थी ) |
| | | रायगड | ३० टक्के | ( १२ विद्यार्थी ) |
| | | पुणे | ६ टक्के | ( २ विद्यार्थी ) |
| २ | कोलाम | यवतमाळ | २० टक्के | ( ८ विद्यार्थी ) |
| ३ | माडीया | गडचिरोली | ३० टक्के | ( १२ विद्यार्थी ) |

वरील तक्त्यातील जिल्ह्यांव्यतिरिक्त इतर जिल्ह्यांतील आदिम जमातीच्या विद्यार्थ्यांचे प्रवेशासाठी ५ टक्के आरक्षण ठेवण्यात येत आहे.

आदिम जमाती विद्यार्थी प्रवेशासाठी उपलब्ध न झाल्यास रिक्त जागा सर्वसाधारण आदिवासी विद्यार्थ्यांमधून भराव्यात.

ओ) शासनाने घोषित केलेल्या अतिदुर्गम संकुलातील गावांमधील विद्यार्थ्यांना प्रवेशासाठी वरीलप्रमाणे प्राधान्य देण्यात यावा.

**(२) प्रवेश प्रक्रिया**

१. प्रत्येक आश्रमशाळेचे मुख्याध्यापक / शिक्षक / अधीक्षक / अधीक्षिका यांनी प्रत्येक वर्षाच्या एप्रिल महिन्यामध्ये प्रवेशाबाबत जनजागृती कार्यक्रमास प्रवेश कार्यक्रम सुरु करावा. पुरेशा आगाऊ सूचनेनुसार बोलाविण्यात आलेल्या खुल्या बैठकीमध्ये आश्रमशाळा योजनेबाबत स्पष्टीकरण करावे. संबंधित वर्षासाठी प्रवेशासाठी सर्व टप्प्यांच्या पुर्ततेसाठी असलेल्या वेळापत्रकांचेही स्पष्टीकरण द्यावे. मुख्याध्यापकाने दारोदारी संपर्क कार्यक्रम आयोजित करण्याचे निश्चित करावे. आश्रमशाळांसाठी ठरवून

दिलेल्या कार्यक्षेत्रामध्ये सर्वेक्षण करणे आणि विद्यार्थ्यांना प्रवेश घेण्यासाठी प्रवृत्त करणे, याबाबतचे कामकाज ३० एप्रिल पर्यन्त पूर्ण करावे.

२. सर्वेक्षणाअंती शासकीय आश्रमशाळेत प्रवेश घेण्यासाठी आलेल्या विद्यार्थ्यांकडून विहित नमुन्यात अर्ज भरुन घ्यावेत. ही कार्यवाही १० मे पर्यन्त पूर्ण करावी.

३. एखाद्या गावातून पुरेसा प्रचार करुनही शाळा प्रवेशासाठी मुलांचे अर्ज आले नाही तर याबाबत प्रथम खात्री करुन घ्यावी व त्या गावाचा विद्यार्थी प्रवेशाचा वाटा दुसऱ्या गावास देण्यात यावा.

४. प्रवेशासाठी प्राप्त झालेल्या अर्जांची रजिस्टरमध्ये नोंद करुन प्रवेशासाठी पात्र विद्यार्थ्यांची यादी तयार करुन प्रकल्प अधिकारी यांची मंजूरी घेण्याचे काम २० मे पर्यन्त पूर्ण करावे.

५. प्रवेश समितीने निवड केलेल्या विद्यार्थ्यांच्या निवड यादीस प्रकल्प अधिकारी यांनी मंजूरी दिल्यानंतर अधीक्षकाने सर्व विद्यार्थ्यांची यादी गुणवत्तेनुसार तयार करुन नोटीस बोर्डावर लावावी. गुणवत्तेप्रमाणे आवश्यक यादी तयार करतांनाच १० मुले व ५ मुलींची प्रतीक्षा यादी देखील तयार करावी. प्रवेश समितीद्वारे तयार करण्यात आलेली इयत्तानिहाय निवड यादी व प्रतीक्षा यादी ३० मे पर्यन्त प्रसिध्द करण्यात यावी.

६. निवड केलेल्या विद्यार्थ्यांच्या घरी पत्रे पाठवून १० दिवसांची मुदत देऊन विद्यार्थ्यांना शाळेत येण्यासाठी लेखी कळवावे ( २० मे पर्यन्त )

७. प्रत्यक्ष प्रवेश देतेवेळी जाती / जमातीचा दाखला, जन्मतारखेचा दाखला, गुणवत्तापत्रक, इ. प्रमाणपत्राची तपासणी करुन घ्यावी. प्रत्यक्ष प्रवेश प्रक्रिया कालावधी दिनांक १ जून ते ५ जून पर्यन्त राहील. सर्व शाळांमध्ये प्रवेशाचा दिनांक व कालावधी एकसारखा असावा.

८. पहिल्या इयत्तेमध्ये नवीन प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थी / विद्यार्थीनींच्या वयाची ५ वर्षे पूर्ण झालेली असावी. परंतु ९ वर्षापेक्षा अधिक नसावी. इयत्ता २ री व ३ री मध्ये नवीन प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या ज्या विद्यार्थ्यांचे वय ११ ते १३ वर्षे असेल त्यांना प्रवेश देण्यात येईल. परंतु ज्या ठिकाणी विशिष्ट इयत्तांसाठी विद्यार्थ्यांची मंजूर झालेली विद्यार्थीसंख्या पूर्ण होत नसेल किंवा आदिम जमातीच्या विद्यार्थी / विद्यार्थीनींच्या बाबतीत प्रकल्प अधिकारी वैयक्तिकरित्या गुणवत्तेच्या आधारावर कमाल वयाची अट शिथिल करतील.

९. पूर्वीच्या मान्यताप्राप्त शाळेकडून मिळालेल्या शाळा सोडल्याच्या प्रमाणपत्राच्या आधारे नंतरच्या इयत्तेमध्ये ( अर्थात इयत्ता २ री पासून ) जागा उपलब्ध असल्यास विद्यार्थ्यांना प्रवेश मिळेल. परंतु असे विद्यार्थी शाळा सोडल्याचे प्रमाणपत्र सादर करु शकत नसतील तर सदर विद्यार्थी अनुसूचित जमातीचे आहेत काय याबाबत पुष्टी करणे आवश्यक राहील. अशाप्रकारच्या निश्चितीची जबाबदारी मुख्याध्यापकांची असेल.

१०. सध्याच्या प्रचलित नियमाप्रमाणेच शालेय समिती (मुख्याध्यापक, २ वरिष्ठ शिक्षक) मार्फत प्रवेशाची कार्यवाही होऊन गुणवत्ता यादी प्रकल्प अधिकारी यांच्याकडे मंजूरीसाठी सादर करुन प्रकल्प अधिकारी यांच्या मंजूर यादीनुसार प्रवेशाची कार्यवाही करण्यात यावी.

तथापि, यात केंद्र प्रमुखांचा देखील समावेश असावा व प्रवेश प्रक्रियेनंतर शाळेमध्ये रिक्त जागा राहिल्यास केंद्र प्रमुखांनी त्यांच्या अधिनस्त शाळांमधील रिक्त जागा व प्रवेश यांची सांगड घालून फेरप्रवेश प्रक्रियेची कार्यवाही २० जून पर्यन्त पूर्ण करावी.

११. निवड यादीतील विद्यार्थ्यांकरिता प्रवेशासाठी विचारार्थ घेतलेल्या शेवटच्या दिनांकानंतरच्या लगतच्या दुसऱ्या दिवशी पहिल्या प्रतीक्षा यादीतील विद्यार्थ्यांकरिता जागेवर प्रवेश देण्यात येईल. अशा प्रकारच्या विशिष्ट दिनांकाची अशी प्रतीक्षा यादी प्रकाशित झाल्याच्यावेळी उल्लेख करण्यात येईल.

१२. प्रवेश देतांना आश्रमशाळांच्या क्षेत्रातील गावातील लोकसंख्या विचारात घेऊन लोकसंख्येच्या प्रमाणात व अर्जदारांच्या संख्येच्या प्रमाणात मुलांना प्रवेश द्यावा. त्याशिवाय प्रत्येक गावातील विद्यार्थ्यास प्रवेश मिळेल याची प्रवेश देतेवेळी दक्षता घ्यावी. आदिवासी विकास विभागामार्फत आदिवासी उपयोजना क्षेत्रातील विशेषतः अतिदुर्गम व डोंगराळ गावांची यादी यापूर्वीच प्रसिध्द करण्यात आली आहे त्याचा वापर प्रकल्प अधिकारी यांनी निवड प्रक्रिया पूर्ण करतांना करावा.

**नापास झालेल्या विद्यार्थ्यांना पुन्हा प्रवेश देण्याबाबत**

१३. प्रवेश देतांना माध्यमिक शालांत परीक्षेत नापास होणाऱ्या मुलामुलींना पुन्हा एकवार प्रवेश देण्याची सवलत ठेवावी.

१४. मुलींना शिक्षणासाठी प्रोत्साहन मिळावे म्हणून आश्रमशाळेतील एखाद्या इयत्तेत निवासी विद्यार्थीनी अनुत्तीर्ण झाल्यास तिला प्रत्येक इयत्तेत एकदा निवासी विद्यार्थीनी म्हणून पुन्हा प्रवेश देता येईल. दुसऱ्यांदा अनुत्तीर्ण झाल्यास अपवादात्मक परिस्थितीत पुन्हा एकदा प्रवेश देता येईल. याबाबतचा निर्णय प्रकल्प अधिकारी यांनी घ्यावा.

१५. एखादा निवासी विद्यार्थी कोणत्याही इयत्तेत अनुत्तीर्ण झाल्यास त्याला जागा उपलब्ध असल्यास पुन्हा प्रवेश देता येईल. एका इयत्तेत दुसऱ्यांदा अनुत्तीर्ण झाल्यास त्याला ही सवलत उपलब्ध होणार नाही.

**प्रवेशाबाबत इतर अडचणीबाबत**

१६. कोणत्याही विद्यार्थ्यास विशिष्ट आश्रमशाळेत प्रवेश देण्यापासून वंचित ठेवले व त्याच्यावर निवड समितीच्या निर्णयामुळे अन्याय झाला आहे असे वाटल्यास त्यांना संबंधित प्रकल्प अधिकाऱ्याकडे सर्व आवश्यक कागदपत्रासह गाऱ्हाण्याच्या मजकूरासह निवड यादी प्रकाशित होण्याच्या एक आठवड्यामध्ये किंवा प्रवेश नाकारण्याच्या दिनांकापासून एका आठवड्यामध्ये अपिल करता येईल.

१७. प्रकल्प अधिकारी प्रकरणाची गुणवत्ता तपासेल व अपिल मिळाल्यापासून एक आठवड्यामध्ये त्याबाबत निर्णय घेईल. आश्रमशाळेमधील विद्यार्थ्यांच्या प्रवेशाबाबत प्रकल्प अधिकारी जो निर्णय घेईल तो अंतिम राहील.

१८. सदर आदेशाची अंमलबजावणी पुढील शैक्षणिक वर्षापासून ( सन २००५-०६ पासून) करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने ,

मफिउल हुसेन

**( मफिउल हुसेन )**
सह सचिव

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे /नाशिक / अमरावती / नागपूर,
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्य मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव,
प्रधान सचिव (आ.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
सह सचिव / उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व कार्यासन, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती, का.१३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.